**संतपीठ प्रशासकीय इमारत उद्धाटन समारंभ**
**कार्यक्रम आयोजन खर्चास मंजूरी देणेबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः शासन निर्णय क्रमांक-संतपी-२०१४/प्र.क्र.४८/सां.का.२**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई
तारीख: ३० जुलै, २०१४

**शासन निर्णय**

मराठवाडा विकासाच्या ४२ कलमांतर्गत पैठण, जिल्हा औरंगाबाद येथे संतपीठाची स्थापना करण्यात आली आहे. संतपीठ प्रशासकीय इमारतीचे उदघाटन दि.१३ फेब्रुवारी २०१४ रोजी करण्यात आले. या उदघाटन कार्यक्रमासाठी झालेल्या एकूण खर्चापैकी चहापान, अल्पोपहार व भोजन यावरील खर्च वगळून रु.२,८४,५१३/- (अक्षरी रुपये दोन लाख चौऱ्याऐंशी हजार पाचशे तेरा फक्त) च्या खर्चास या शासन निर्णयान्वये कार्योत्तर मंजूरी देण्यात येत आहे. यासंदर्भातील खर्च व देयके खरी व अचुक असल्याच्या अधीन राहून तसेच शासनाचे प्रचलित सर्व वित्तीय नियम, विनियमातील तरतूदी, आदेश / परिपत्रक/सीव्हीसी मार्गदर्शक सूचना, इत्यादींचे पालन करण्याच्या अटींच्या अधीन राहून संतपीठ प्रशासकीय इमारतीच्या उदघाटन कार्यक्रमासाठी झालेल्या सदर खर्चास कार्योत्तर मंजूरी देण्यात येत आहे.

याबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय, मुंबई यांनी सादर करावे.

याबाबतचा खर्च, “मागणी क्र.झेडडी-१, २२०२, सर्वसाधारण शिक्षण (०३) विद्यापीठीय व उच्च शिक्षण १०२, विद्यापीठांना सहाय्य, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना (०१) योजनांर्गत योजना (०१) (०१) सर्वसाधारण शिक्षणासाठी विद्यापीठांना अनुदाने (संतपीठ) (२२०२ ३५९३) ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर)” या लेखाशिर्षाखाली सन २०१४-१५ या वित्तीय वर्षात मंजूर झालेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय नियोजन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.१९९/१४४४, दि.३१.५.२०१४ व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.४९९/व्यय-१४, दि.१७.७.२०१४ अन्वये प्राप्त सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०७३०१६२०३६९०२३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Pradeep Ramchandra More

Digitally signed by Pradeep Ramchandra More
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TOURISM AND CULTURAL AFFAIRS, postalCode=400032, st=MAHARASHTRA, cn=Pradeep Ramchandra More
Date: 2014.07.30 16:35:53 +05'30'

(प्रदिप रा. मोरे)
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय, मुंबई.
२. महालेखापाल,महाराष्ट्र-१(लेखा व अनुज्ञेयता / लेखा परिक्षा), मुंबई.
३. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
४. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
५. नियोजन विभाग (का.१४४४), मंत्रालय, मुंबई.
६. वित्त विभाग (व्यय-१४), मंत्रालय, मुंबई.
७. अवर सचिव (अर्थसंकल्प) पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग,मंत्रालय,मुंबई.
८. निवड नस्ती, सां.का.२